**कोकणातील लघु पाटबंधारे योजनांसाठी आर्थिक मापदंडात सुधारणा**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र.मापदंड २३०९/(२५५/२००९)/ लपा-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ / ०७/२००९

**पहावे :-**जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मापदंड २३०७/(४८/२००७) लपा-२, दिनांक ३/१/२००८

**प्रस्तावना :-**

कोकणातील विशिष्ठ असाधारण भौगोलिक परिस्थिती, नद्यांची लांबी कमी असणे, वाळूची कमतरता, तसेच कालवा लांबीत कमी सिंचन होणे, डोंगराळ प्रदेशामुळे कालव्यांच्या पारेषण कामातील खर्चात होणारी वाढ, भूसंपादन, तसेच संपादीत जमीनीमध्ये झाडांचे - फळझाडांचे प्रमाण जास्त असल्याने मुल्यांकनातील वाढ तसेच दगडी बांधकामा ऐवजी संधानकात उत्सारी भागाचे काम करणे इ.मुळे कोकणातील लघु पाटबंधारे प्रकल्पांच्या खर्चामध्ये खूप वाढ होत असल्याने योजना प्रचलित मापदंडात बसत नाहीत व त्यामुळे कोकणातील लघु पाटबंधारे योजनांचे मापदंडात वाढ करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

उपरोक्त नमूद सर्व बाबींचा विचार करून शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

कोकणातील लघु पाटबंधारे योजनांसाठी प्रचलित असलेल्या आर्थिक मापदंडात सुधारणा करुन विवरणपत्र-अ प्रमाणे नविन आर्थिक मापदंड शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील आदेशापर्यंत लागू राहतील.

वरील मापदंड लावतांना खालील अटी लागू राहतील.

१) कालवे प्रस्तावित नसलेल्या साठवण लघु पाटबंधारे तलावांच्या योजना घेण्यास हरकत नाही. अशा योजनांना त्या त्या वर्गवारीच्या त्या त्या क्षेत्रातील लघु पाटबंधारे तलावांसाठी विहीत केलेल्या मापदंडाच्या ८० टक्के मापदंड लागू समजावा. अशा योजनांच्या लाभक्षेत्रांपैकी किमान ५० टक्के क्षेत्र त्यांच्या पाणलोट क्षेत्रातील जलाशयाच्या परिसरातील असावे.

२) प्रकल्पांच्या नवीन प्रशासकीय मान्यतेसाठी जिल्हा हा घटक ठरविण्यात आला असून सध्या वाशिम,अकोला,बुलढाणा,उस्मानाबाद आणि जालना या फक्त ५ जिल्हयांमध्येच सिंचनाचा अनुशेष शिल्लक आहे. नवीन लघु पाटबंधारे योजनांच्या प्रशासकीय मान्यतेसाठी मा.राज्यपालांचे निर्देशानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३) मापदंड सन २००८-२००९ च्या दरसुचीवर आधारित आहे.

४) सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०७२९१७४४०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : विवरणपत्र "अ"

**( वि.म.निकंबे)**
**शासनाचे उप सचिव**

C:\DOCUME~1\CHAVAN~1\Desktop\Mapdand GR 29.7.09.doc

प्रत अग्रेषित :-

मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सचिव
मा.मंत्री (कृष्णा खोरे) यांचे स्वीय सचिव
मा.मंत्री (जलसधारण) यांचे स्वीय सचिव
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सचिव
मा.राज्यमंत्री (कृष्णाखोरे) यांचे स्वीय सचिव
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे स्वीय सचिव
महालेखापाल महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई / नागपूर
महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
सहकार व वस्त्रोद्योग, मंत्रालय, मुंबई
कृषी व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (रोजगार हमी योजना) व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे व सर्व महामंडळे
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
मुख्य अभियंता (लपा) (स्थानिक स्तर) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, पुणे
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व अधीक्षक अभियंता व उप सचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिकस्तर) मंडळ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
उप सचिव (लपा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (लपा)/(खारभूमी) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व कार्यकारी अभियंता, सिंचन विभाग, जिल्हा परिषद / लपा (स्थानिक स्तर) विभाग,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक कार्यासने जलसंपदा विभाग,
लपा- १/लपा-२/खारभूमी/कार्यासने, जलसंपदा विभाग,
लपा-२ निवडधारिका
उप अभियंता, लपा-२ (श्री.खंदारे) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, विधान भवन, मुंबई
माहिती व जनसंपर्क संचालनालय, (प्रसिध्दीसाठी)

**विवरणपत्र - अ**

**शासन निर्णय क्रमांक : मापदंड २३०९/(२५५/२००९)/लपा-२**

**दिनांक :- २९/०७/२००९ चे सहपत्र.**

| अ.क्र. (१) | लघु पाटबंधारे योजनांचा प्रकार (२) | प्रचलित मापदंड (किंमत रु.प्रति स.घ.मी. पाणीसाठा) (३) | सुधारित मापदंड (किंमत रु.प्रति स.घ.मी. पाणीसाठा) (४) | लाभव्यय प्रमाण (५) |
|---|---|---|---|---|
| १) | **कोकण विभाग**<br>**अ) लघु पाटबंधारे योजना** | | | |
| | अ-१) ० ते १०० हेक्टर | ३३९६४ | ८४९१० | एका पेक्षा अधिक |
| | अ-२) १०१ ते २५० हेक्टर | ३३००१ | ७४२५२ | एका पेक्षा अधिक |
| | अ-३) २५१ ते २००० हेक्टर | ३३००१ | ६६००२ | एका पेक्षा अधिक |
| | **ब) कोल्हापूर पध्दतीचे बंधारे**<br>ब-१) साठवण क्षमता ६०० सघमी पेक्षा जास्त | १७०६६ | २१३३३ | एका पेक्षा अधिक |
| | ब-२) साठवण क्षमता ६०० सघमी पेक्षा कमी व ३०० सघमी पेक्षा जास्त | २०३२६ | २५४०८ | एका पेक्षा अधिक |
| | ब-३) साठवण क्षमता ३००सघमी पेक्षा कमी व १५० सघमी पेक्षा जास्त | २८२२६ | ३५२८३ | एका पेक्षा अधिक |
| | ब-४) साठवण क्षमता १५० सघमी पेक्षा कमी | ३०४८८ | ३८११० | एका पेक्षा अधिक |
| | **क) पाझर तलाव** | ३१२६२ | ३९०७८ | प्रश्न उद्‌भवत नाही |
| | **ड) वळवणीचे बंधारे** | ४५१३७ | ४५१३७ | एका पेक्षा अधिक |

टीप : १) वरील लघु पाटबंधारे योजनांचे मापदंड हे प्रकल्प एकवेळ भरण्यासाठीचेच आहेत.

२) कालवे प्रस्तावित नसलेल्या साठवण लधु पाटबंधारे तलावांच्या योजनांना त्या त्या क्षेत्रातील लघु पाटबंधारे तलावासाठी विहीतकेलेल्या मापदंडाच्या ८० टक्के मापदंड लागू समजावा. अशा योजनांच्या लाभक्षेत्रांपैकी किमान ५० टक्के क्षेत्र त्यांच्या पाणलोट क्षेत्रातील तलावाच्या परिसरातील असावे.